सन २०२१-२२ मधील प्राप्त तरतूदीचे वितरण करणेबाबत
राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४).

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०६२१/प्र.क्र. ६९ /२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२२

**संदर्भ :-**
१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर १४०६/प्र. क्र. २४७ /२-स, दि १७.०५.२००६.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सीसीआर ०३१३/प्र. क्र. १४४/२-स, दि ०५.०९.२०१४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१ /कोषा- प्रशा ५, दि.१०.०५.२०१६
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र. कृषीपत-८/अंदाजपत्रक/निधी मागणी/२०२१, दिनांक ११.०५.२०२१
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. पुरक २०२१/प्र.क्र. ७८ /अर्थ-३, दि.२०.०७.२०२१
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पुरक १९२१/प्र. क्र. ३३/१७-स, दि. २०.०७.२०२१.
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं ०५२१/प्र. क्र. ५७/२-स, दि. १७.०१.२०२२.
८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं ०६२१/प्र. क्र. ६९/२-स, दि. २४.०१.२०२२.
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं ०६२१/प्र. क्र. ६९/२-स, दि. ०३.०३.२०२२.
१०) वित्त विभाग शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दि. १७.०३.२०२२.

**प्रस्तावना -:**

राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (२४२५ २५२४) या योजनेअंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत शेतकऱ्यांना दिलेले पीककर्ज ६ टक्के व्याजदराने उपलब्ध होण्यासाठी राज्यशासनाकडून २.५ टक्के व्याज परताव्याची रक्कम जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना मंजूर करण्यात येते. “राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (२४२५ २५२४)” या योजनेअंतर्गत सन २०२१-२२ या

आर्थिक वर्षात सुधारीत अंदाज २०२१-२२ अन्वये रु. ४३०.०० कोटी इतका निधी उपलब्ध आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतुदीमधून रु. २५८.०० कोटी इतका निधी संदर्भ क्रमांक ७, ८ व ९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. सहकार आयुक्त यांच्या संदर्भ क्र. ४ दिनांक ११.०५.२०२१ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावातील मागणीनूसार सदर योजनेसाठी रु. १७२.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत रु. १७२.०० कोटी (रु. एकशे बाहत्तर कोटी फक्त) एवढा निधी राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरण करण्यासाठी सहाय्य (राज्यस्तर)(कार्यक्रम), (२४२५ २५२४) या लेखाशिर्षाअंतर्गत ३३ अर्थसहाय्य या बाबी साठी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदरहू रक्कम मागणी क्रमांक व्ही-०२, २४२५-सहकार (००) (१०७) सहकारी पतसंस्थांना सहाय्य (०१)(१६) राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी अर्थसहाय्य (२४२५ २५२४), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १५३/१४३१ दिनांक ३०.०३.२०२२ अन्वये व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २४९/व्यय-२ दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३३१२३३३४४८४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2022.03.31 23:35:35 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी व सहनिबंधक**
**(सहकारी संस्था), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.

३) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.

५) निवासी न लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन २-स).